**अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेंतर्गत अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**संविधान मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., केकतपांगरी, ता. गेवराई, जि. बीड**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मासाका-२०२४/प्र.क्र. १६६/ अजाक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक : २९ जुलै, २०२४.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. मासाका -२००८/ प्र.क्र.१५०/ विघयो-२, दिनांक २२.५.२००८
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. मासाका-२०१०/प्र.क्र.५२/ विघयो-२, दिनांक ३०.०३.२०१०
३) शासन शुध्दीपत्रक, दिनांक २८ फेब्रुवारी, २०१४
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.सीबीसी/१०/२०१४/प्र.क्र.१५६/ मावक, दिनांक २८.०८.२०१४
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. मासाका-२०१३/प्र.क्र.२२१/ अजाक- १, दिनांक २६.०८.२०१५
६) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे परिपत्रक, क्र. सकआ/अजाउयो.१/ सह. संस्था/ ४३१, दि.२२.०६.२०१६
७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. मासाका-२०१७/प्र.क्र.१०४/ अजाक, दिनांक ०६.११.२०१७
८) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. मासाका-२०१८/प्र.क्र.२३१/ अजाक, दिनांक २४.१०.२०१८
९) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. मासाका-२०१८/प्र.क्र.२४३/ अजाक, दिनांक १४.११.२०१८
१०) शासन पत्र क्र. मासाका-२०१८/प्र.क्र.३५०/ अजाक दि. १३.०२.२०१९
११) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय यांचे पत्र क्र. सकआ/ अजाउयो-१/स. सं. प्रस्ताव/यश. माव/ २०२३-२४/का-१४/पुणे/ २९९, दिनांक १४ मार्च, २०२४.

**प्रस्तावना**

अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य ही योजना सन २००४-२००५ मध्ये कार्यान्वित करण्यात आली आहे.

अनुसूचित जातीच्या औद्योगिक सहकारी संस्थांना अर्थसहाय्य देण्याबाबत सन २०१२ पासून प्रलंबित असलेल्या प्रस्तावांबाबत दि. २४ ऑक्टोबर, २०१८ च्या शासन निर्णयानुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचेकडे प्रलंबित असलेल्या जवळपास ४४९ प्रस्तावांची छाननी करण्यासाठी सहसचिव (अजाक) यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात आली आहे. त्यानुसार सदर ४४९ प्रलंबित प्रस्तावांपैकी शासनाकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावांमध्ये संविधान मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., केकतपांगरी, ता. गेवराई, जि. बीड या संस्थेचा समावेश आहे. सदर संस्थेने शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून सदर संस्थेस अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

संविधान मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., केकतपांगरी, ता. गेवराई, जि. बीड या संस्थेचा प्लॅस्टिक मोल्डींग प्रोजेक्ट मालाचे उत्पादन प्रकल्प उभारणीसाठीचा एकूण रु. ७००.०० लक्ष इतक्या किंमतीचा प्रकल्प बीड जिल्ह्यात प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प उभारणीसाठी प्रस्तुत संस्थेस अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध तरतूदीतून पहिला हप्ता शासकीय भागभांडवलापोटी रु. ५०.०० लक्ष रुपये (रुपये पन्नास लक्ष फक्त) व दिर्घ मुदतीचे कर्जापोटी रु. ५०.०० लक्ष रुपये (रुपये पन्नास लक्ष फक्त) असे एकूण रुपये १०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त) एवढे अर्थसहाय्य मंजूर करण्यास सदर योजनेंतर्गत विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत संस्थेचा प्रस्ताव आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. ११ येथे नमूद पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे. सदर संस्थेस पहिला हप्ता मंजूर करण्यासाठी शासनाने अनुसूचित जातीच्या औद्योगिक सहकारी संस्थांना अर्थसहाय्य देण्याच्या योजनेअंतर्गत विहित केलेल्या अटी व शर्तीची काटेकोर पूर्तता संस्थेने केली आहे याची खात्री आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी करावी.

३. सदरच्या संस्थेची मा. न्यायालयात याचिका दाखल नसल्याबाबत खात्री करण्यात यावी.

४. सदर संस्थांना निधीचे वितरण करण्यापूर्वी क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी प्रकल्पाची प्रत्यक्ष स्थळपाहणी करतील. सदर स्थळपाहणी अहवाल सादर झाल्यानंतरच सदर संस्थांना निधीचे वितरण करावे.

५. या योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या शासकीय कर्जाचा व्याजाचा दर ठरविण्याची कार्यवाही शासन स्तरावर सुरु आहे. शासनामार्फत जो व्याजाचा दर निश्चित केला जाईल तो व्याजाचा दर सदर कर्जास लागू असेल.

६. सदर संस्थांना दिलेल्या शासकीय कर्जाची परतफेड संस्थेस देय असलेल्या प्रकल्प मुल्याच्या ७०% रक्कम अदा केल्यानंतर दोन वर्षांनी सुरु करण्यात यावी. कर्ज परतफेडीचा कालावधी ६ वर्षांचा राहील. कर्जाची (मुद्दल) रक्कम ४ वर्षाच्या आत १६ समान त्रैमासिक हप्त्यात करण्यात यावी व नंतर व्याजाची वसुली दोन वर्षात ८ समान त्रैमासिक हप्त्यात करण्यात यावी.

७. सदर योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या भागभांडवलाची रक्कम प्रकल्प पुर्ण झाल्याच्या दिनांकापासून १० समान हप्त्यात १० वर्षात संस्थेने शासनास परत करणे आवश्यक आहे.

८. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील दर्शविण्यात आलेला निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

९. उपरोक्त निधी आहरीत केल्यानंतर आयुक्त (समाजकल्याण) यांनी त्यांचे अधिनस्त ठेवावा. विहित अटींची व त्रुटींची पूर्तता झाल्यानंतरच निधी वितरीत करण्यात यावा.

१०. यासाठी आयुक्त समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, देयकावर प्रती स्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास देण्यात येत आहेत.

११. या विभागाच्या दि.६.११.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी कार्यवाही करावी.

१२. यावर होणार खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू आर्थिक वर्षाकरीता मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा:

**भागभांडवल रु.५०.०० लक्ष रुपये (रुपये पन्नास लक्ष फक्त)**
**मागणी क्रमांक एन-४**
४२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (पंचवार्षिक योजनांतर्गत

योजना, राज्य योजनांतर्गत योजना)
(०१)(०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भाग भांडवली अंशदान (४२२५ ०४५ २)
**३२, अंशदाने**

**दिर्घ मुदतीचे कर्ज रु.५०.०० लक्ष रुपये (रुपये पन्नास लक्ष फक्त)**
**मागणी क्रमांक एन-४**
६२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणासाठी कर्ज
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
८००, इतर कर्जे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (विघयो)
(०१)(०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे (६२२५ ०२५ १)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या मर्यादेत व प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२९१८२६३४६८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.07.29 18:40:55 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड,
५. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, छत्रपती संभाजीनगर,
६. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, बीड,
७. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, बीड,
८. अध्यक्ष, संविधान मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., केकतपांगरी, ता. गेवराई, जि. बीड
९. कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प कार्यासन, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१०. निवडनस्ती (अजाक).